# डॉ वि ह सरांना आठवताना
## भाग १







डॉ अविनाश खरातांनी घेतलेली मलाखत

**डॉ विश्वनाथ हरी कुलकर्णी** हे कैलासवासी झाल्याची माहिती ग्रहांकित च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली आहे. दिवाळी अंक बाजारात जाऊन विकत घेऊन वाचणारे कमी होत आहेत. त्यातलाच मी एक. ज्योतिष तंत्र आणि मंत्रच्या दिवाळी अंकात मुखपृष्ठ कथा करायला रमल तज्ज्ञ चंद्रकांत दादा शेवाळे यांनी विनंती केली होती. 'श्रृंगेरीचे विद्याशंकर मंदिर परिसर' कथा प्रसिद्ध झाली म्हणून तो आणि ग्रहांकितचा दिवाळी अंक कॉम्प्लिमेंटरी म्हणून पोस्टाने मला

मिळाले, तेंव्हा मला डॉ वि ह सर वयाच्या ८८व्या वर्षी २५ सप्टेंबर २०२१ रोजी गेल्याचे समजले.
मग  त्यांच्या आठवणी जाग्या झाल्या...
सन १९९८ चे साल होते मी तेंव्हा नगर रस्त्यावरील ९ बीआरडी (बेस रिपेअर डेपो) मधे पोस्टींगवर सीनियर अकौंट्स ऑफिसर म्हणून रुजू होतो.
'बाहेरून कोणाचा तरी फोन आला आहे. ते तुम्हाला भेटू इच्छितात. जोडून द्यायला तुम्ही हो म्हणालात तर लावून देतो'. हवाईदलातील खाक्यानुसार टेलिफोन एक्सचेंजकडून विचारणेला जसे उत्तर येईल तसे हो किंवा नाही ठरते. मी हो म्हणालो, 'मी, डॉ वि ह कुलकर्णी बोलत आहे. आपल्याकडून काही मदत हवी आहे. फार फार निराशा झाली आहे. कोणी माझ्या कामाला विचारात घेऊन माझ्या पत्रांना साधे पोचपत्र पाठवत नाहीत... तेही मिलिटरीच्या कार्यालयातून... तुम्ही माझ्या ओळखीच्यापैकी  हवाईदलातील आहात. म्हणून तुम्हाला भेटायला आलो तर चालेल का हे विचारायला फोन केला आहे.
माझ्या डोळ्यासमोर खणखणीत आवाजात बोलणारे व्यक्तिमत्त्व उभे राहिले. हवाईदलातील एयर फोर्स स्कूलचे प्रिन्सिपॉल म्हणून ते रोस्ट्रंपवरून ॲन्युवल गॅदरींगचे उद्धाटन भाषण करत होते. निमंत्रित वरिष्ठ हवाईदलातील अधिकारी म्हणून मीही त्या फंक्शनला हजर होतो. नंतरच्या चहापानाच्या वेळी आम्ही जुजबी गोष्टी बोललो. ही माझी पहिलीच वेळ होती भेटीची.
ते नंतर रिटायर झाले. मी ही हलवारा विमानतळावर पोस्टींगला गेलो. बरीच वर्षे गेली. मीही रिटायर झाल्यावर पुण्यात सेटल झालो.
या दरम्यानच्या काळात मला नाडी ग्रंथांबद्दल आकर्षण निर्माण झाले. 'नाडी भविष्य थोतांड आहे' असे सिद्ध करण्यासाठी चंग बांधून मागे लागलो. नंतर मात्र मत परिवर्तन घडून ताडपट्ट्यातील लेखनातील बारकावे शोधायला सुरुवात केली. प्राचीनकाळापासून रामायण, महाभारत, भागवत ग्रंथाच्या माध्यमातून आपल्या वाचनात येणाऱ्या अगस्त्य, वसिष्ठ, विश्वामित्र, काकभृशंडी, व्यास, महर्षींच्या नावाने तमिळ भाषेत ताडपट्टीच्या माध्यमातून सध्याच्या मानवतेला उपयोगी लेखन केले आहे. हे उमजले. त्या सर्वांबद्दल कृतज्ञता वाटायला लागली.
फोनवर डॉ वि ह कुलकर्णी बोलत होते. 'मी डाऊझिंग करतो हे तुम्हाला माहीत आहे. सध्याच्या परिस्थितीत काश्मिर आणि अन्य भागात बॉम्ब स्फोट घडवून आणले जात आहेत.

सुरक्षाव्यवस्था वैतागून गेली आहे. जमिनीच्या खाली पुरलेले बॉम्ब स्फोट होऊन कुठूनही नागरिक व सुरक्षा दलाच्या जवानांना ठार केले जाते. यावर उपाय म्हणून मॅप डाऊझिंगकलेचा उपयोग होऊ शकतो. दुसऱ्या महायुद्धात डाऊझिंग करून जमिनीखालून पुरलेले बॉम्ब, पाय कचाट्यात धरणारे सापळे यांच्या शोधासाठी वापर केला जात होता. हे सांगणारा लेख मी वाचला. मिलिटरीच्या वेगवेगळ्या कार्यालयात पत्रे पाठवून मला देखिल मॅप डाऊझिंगकरून शोधायला संधी द्यावी म्हणून मागे लागलो होतो. पण कोणीही उत्तर देखील दिले नाही.



मला त्यांच्या सुरातून निराशा जाणवली.

मलाही कटू अनुभव आले होते. मी तर एकदा नवी दिल्ली येथे प्रत्यक्ष भेट घेऊन एक निवेदन सादर केले होते. मात्र ते वाचून मलाच फैलावर घेतले गेले. 'तू स्वतःला अकौंट्स ब्रांचचा म्हणवतोस. तुला रूल पोझिशन माहिती नाही? एयर फोर्स ऑॅर्डर वाच' म्हणून ते चोपडे माझ्यासमोर फेकून सुंदर कटलरीमधून आलेल्या चहाची चव घालवली होती.

'सर या ऑर्डर्स आपण बनवलेल्या आहेत. त्यामुळे त्यात बदल होऊ शकतो'. माझ्या बोलण्याचा काहीही प्रभाव न पडून मी चहा अर्धवट सोडून परतलो होतो. नंतर मी म्हणत होतो तसे विचार चीफ ऑफ एयर स्टाफनी मांडले तेव्हा तेच अकौंट्स ब्रांचचे वरिष्ठ अधिकारी, त्यांना म्हणाले, 'बट सर, एयर फोर्स ऑर्डर परवानगी देत नाही तसे करायला'

'देन, चेंज द ऑर्डर' म्हणून चीफनी ऑर्डर दिली! तसे बदल घडून आले...!

हे नंतर त्या ऑफिसमधे काम करणाऱ्या माझ्या मित्राने सांगितले होते. असो.

'वि ह सर, अहो तुमच्या पत्राला वाचायला आहे कोणाला वेळ? अशी पत्रे टोपलीची शान वाढवतात'. शिवाय डाऊझिंग वगैरे ऑकल्ट सायन्स म्हणून मानतात. अशा गोष्टी खाजगीत करायला चालतात. पण ते खरे मानून करत बसायला शक्य नाही.'

'खरे आहे आपले म्हणणे, म्हणून मी काही प्रयोग करून मग ठरवले जावे असे सुचवले होते.'

'सर सांगा काय करता येईल' ? म्हणून त्यांची निराशा कमी व्हावी म्हणून सुचवून पाहिले.
'आता तुम्ही पण असे म्हटल्यावर प्रश्नच संपला.' ते म्हणाले.
माझ्या समोर पडलेल्या फाईल्स, पेमेंटसाठी थांबून राहिलेले पाहून मी संभाषण आवरते घेतले. मी नंतर संपर्क करतो म्हणून इतर कामात गढलो. घरी आल्यावर, 'डाऊझिंगचा उपयोग करता आला तर किती छान होईल' असे वाटत वि ह सरांना संपर्क केला.
'सर मी सुचवू का? तुम्ही आणि मी आपण काही प्रयोग करून पाहूयात का?'
'काय करायचे ते बोला मी तयार आहे'. ते म्हणाले.
'तुम्ही म्हणता तसे आपण मॅप डाऊझिंग करून पाहूया'.
'विमानांना वाहतूकीला सोईचे म्हणून आमचे परेड ग्राऊंड सीमेंट ब्लॉक चौकोनाचे बनलेले असतात. तिथे मी एक वस्तू ठेवतो. ती वस्तू कुठे ठेवली आहे ते तुम्ही तुमच्या घरून डाऊझिंग करून सांगायचे. पाहूया किती बरोबर येते'.



'हो चालेल ना! मी तयार आहे. मी असे करतो की एक चौरस तक्ता कागदावर तयार करतो. त्याला उभ्या एक्स ॲक्सेस वर १,२,३,४ नंबर देऊ. व आडव्या वाय एक्सेस वर A, B, C, D असे ग्रिड तयार होईल. त्या कागदावर मी डाऊझिंग करून तुम्ही ठेवलेल्या वस्तू कुठे आहेत ते सांगेन की बी २ मधे ती वस्तू आहे किंवा डी १ मधे दुसरी आहे असे डाऊझिंग सांगतेय. मग आपण ते तपासून किती बरोबर आले याची नोंद करून रेकॉर्ड तयार करू शकतो'.

'मला विह सरांच्या कल्पकतेची दाद द्यावी असे वाटले. ऑफिसात काम करणाऱ्या एका चुटपुटीत सार्जंटला स्कूटरवरून माझ्या मागे ये म्हणून मी ऑर्डर केली.

तो आणि मी टारमॅकवर गेलो. तिथल्या २० फूट चौकोनाचे, ४ बाय ४ सीमेंटच्या ब्लॉकच्या सीमा मी सार्जंटला दाखवून ठरवून दिल्या.

‘सर, मैं पूछूं के किस लिए कर रहे है?’

या लोकांना  डाऊझिंग ते काय सांगितले तर माझ्यामागे चेष्टेचा विषय करतील म्हणून ते गुह्य ठेवून म्हटले की जो बोला वैसे कर. तू तुझी स्कूटर या पैकी एका चौकोनात ठेवायची. समज तू या सी ३ मधे लाव. मी परत जातो. तू इथेच थांब. मी परत येतो. मग पुन्हा एकदा स्कूटरची जागा बदलून ठेवूया.

'जी हां सर...'

मी ऑफिसात येऊन फोन वरून मॅप रीडींग करून सांगा म्हणून म्हटले. माझे ऑफिस नगर रोडवर. तिथून आत परेड ग्राऊंड २ किमी अंतरावर. वि ह सर राहायला रास्ता पेठेत. अपोलो टॉकीजच्या जवळ. आमच्यात नकाशा वर कमीत कमी १० किमी आकाश अंतर आहे. म्हणून त्यांना सार्जंटची स्कूटर नेमकी कुठे ठेवली आहे हे समजणे अशक्य होते. नव्हे तशी समजू नये अशी आम्हास अपेक्षा होती.



फोनवर विह म्हणाले, ‘तुम्हाला फोन करून कळवतो. सध्या माझ्यासमोर काही लोक समस्या सोडविण्यासाठी कन्सलटेशन करायला आलेत ते झाले की डाऊझिंग करून कळवतो’.
‘मला बाहेरून फोन येईल तो मला लगेच लावून द्या’ असे मी टेलिफोन एक्सचेंजला सांगून वाट बघत ऑफिसच्या कामात गढलो.
फोनची बेल वाजली. 'मी वि ह कुलकर्णी बोलतोय' असे नेहमीचे बोल ऐकून ते पुढे म्हणाले, ‘डाऊझिंग सांगतेय की ती वस्तू सी ३ च्या जवळपास आहे. ती मोठी आहे. पण माणूस नाही.’ असे पेंडूलम फिरत सांगतो. आता सांगा कोणती वस्तू आहे? डाऊझिंग म्हणतेय ते बरोबर आहे का?’
‘सर, ती वस्तू म्हणजे स्कूटर आहे. ती सी ३ पाशी होती. हा प्रयोग यशस्वी झाला आहे असे मला वाटते. आता आपण ती स्कूटर जागा बदलून पाहू काय उत्तर येते ते.’
तोवर त्या सार्जंटची स्वारी सॅल्युट मारून समोर आली.
' सर, टारमैकपर गर्मी से हालत बुरी हुई, पसीने छूट गये, वॉरंट ऑफिसरने दिया काम बाकी था. इसलिये वापिस आये हैं...! '
'अच्छा अच्छा, तुम काम पर जाओ' म्हणून मी त्याची बदली केली.
यावेळी मी माझी स्कूटर एका दुसऱ्या चौरसात लावली. तिकडून डॉ वि ह कुलकर्णी यांनी डाऊझिंग मधील दिलेले उत्तर बरोबर आहे असे लक्षात आले. नंतर मात्र अशा प्रकारे प्रयोग करून त्याची नोंद घ्यायला झाले नाही. माझी पोस्टींग झाली. ते दादरच्या घरात व्यस्त झाले. ते मॅप डाऊझिंग तसेच राहिले...
पण तसे ते संपणार नव्हते... पुढच्या भागाची वाट पहा.

**शनिवारवाडा भूताटकीचा?**

# डॉ वि ह सरांना आठवताना

## भाग २

### डाऊझिंग - लंबक विद्या

अज्ञाताचा शोध घेण्याचा मार्ग

शापित वास्तू शनिवार वाडा



तज्ज्ञ डॉ वि ह कुलकर्णी

भेटकर्ता - शशिकांत ओक

St. Augustine



## डॉ वि ह सरांना आठवताना

आमची खरी ओळख झाली, ती डॉ वा वि अकोलकर सरांच्या घरी. तिथे कै. प्रकाश पेंडसे आणि ते माझी वाट पहात होते.

कारण असे होते की २५ ऑक्टोबर १९९५ ला एक मीटिंग गो. ल. आपटे सभागृहात आयोजित करण्यात आली असल्याचे पुण्यातील सर्व महत्त्वाच्या पेपर मधे छापून आले होते. विशेष म्हणजे या सभेचे नेतृत्व डॉ नरेंद्र दाभोलकर करणार असल्याच्या वृत्तामुळे त्या सभेला उपस्थित बरीच होणार हे निश्चित होते.

नेहमीप्रमाणे परदा फाश करायला अशा सभेचा प्रस्ताव होता.

विषय होता, ‘नाडी भविष्य म्हणून गाजावाजा करून विंग कमांडर शशिकांत ओक यांनी ज्योतिष शास्त्रात खळबळ उडवून दिली आहे. त्यामुळे अंनिसने या प्रकरणी केली आहे पुढाकार घेऊन ओकांना उघडे पाडायला ही सभा आयोजित’.

कदाचित ओक चेन्नईला असल्याने ते काही सभेला उपस्थित राहणार नाहीत, अशा अंदाजात ते असावेत. कर्मधर्मसंयोगाने  ओक नेमके पुण्यात त्या दिवशी होते. त्यांना ही सभा मोठी पर्वणी आहे असे वाटले.



**ओक आणि पेंडसे नाडीग्रंथावरील कार्यशाळेत बोलताना**

त्या वेळी पुण्यात ओकांना ओळखणारे हाताच्या बोटांवर मोजता येतील इतके होते. प्रकाश पेंडसे ओकांच्या पुस्तकातील पत्ता शोधून भेटले. डॉ वा वि अकोलकरांना 'उत्तरा हुद्दार पुनर्जन्म प्रकरणात' अंनिसने डिवचून राग ओढवून घेतला होता. तिथे डॉ वि हं शी भेट झाली. ओकांनी सभेत जावे का कि नंतर पत्रकार परिषदेत आपले म्हणणे मांडावे? समजा दाभोळकर यांनी पुरावे सादर केले तर त्यावर ओकांकडे काय मुद्दे आहेत? ते सादर करून नाडी भविष्याची सत्यता पडताळून पाहता येईल ? वगैरे मुद्दे विचारात घेतले गेले शेवटी ठरले की ओकांनी सभेत हजर राहून आधी डॉ दाभोळकरांची बाजू समजून घेऊन मग आपली बाजू मांडावी. प्रकाश पेंडसे अंनिसच्या अनेक कार्यक्रमात जात असत. ते डॉ दाभोळकरांची परवानगी घेऊन सुरवातीला ओक सभेत उपस्थित असल्याचा गौप्यस्फोट करतील. नंतर ओक आपल्या कडील पुरावे सादर करतील. तोपर्यंत सभेला किती अंनिस कार्यकर्ते उपस्थित होते, तमिळ भाषा जाणणारे कुणी असेल तर ते किती वगैरे नोंद करायला डॉ वि ह सरांनी पुढाकार घ्यायचे ठरले.

ठाण्याच्या डॉ विजय बेडेकरांनी या सभेवर आक्षेप घेणारे परिपत्रक काढून त्याच्या प्रती तातडीने पुण्यात पाठवल्या.

प्रकाश पेंडसे सांगतात  नाडीविरोधक मा श्री रिसबुड का रुसलेत ज्योतिषशास्त्रावर

लिंक क्लिक करून उघडा

सायंकाळी सात वाजता सभागृहात बरीच गर्दी होती. डॉ दाभोळकर यांच्या ऐवजी डॉ बोरकर यांनी अध्यक्षीय स्थान भूषवले. ओक मागे बसून कार्यक्रम पहात होते. आधीचे सोपस्कार पार पडले मग ज्या कारणाने सभा बोलावली होती तो विषय 'नाडी भविष्य कसे थोतांड आहे. सध्या नमस्कार कोणी एक विंग कमांडर शशिकांत ओक नावाचा ग्रहस्थ या ज्योतिष प्रकाराचा धूमधडाक्यात प्रचार करत आहेत वगैरे बोलून झाल्यावर डॉ वि ह सरांनी पेपर मध्ये पुरावे सादर करणार म्हणून म्हटले गेले आहे ते बाहेर काढा? डॉ बोरकर हो हो म्हणाले. त्यावर मग वि ह म्हणाले की या सभेत कोणी तमिळ भाषा जाणकार असतील तर ते तो पुरावा तपासतील. मात्र पुरावे सादर करायला काचकूच होताना पाहून ओक यांनी सभेचा ताबा घेतला. प्रथम आपली ओळख करून दिली. जेंव्हा काही झेरॉक्स कागद पुढे केले गेले. ते हातात घेऊन त्यात ओकांचे 'शशिकांत' नाव कुठे व कसे लिहिलेले दिसते का ते इथे

जमलेल्या तमिळांना वाचता आले नाही तर नाडी ताडपट्टीत नावे वगैरे काही लिहिलेले नसते असे आपसूकच सिद्द होईल मग आम्हाला नाडीपट्टी पहायला नाडीकेंद्रात जायची गरजच नाही असे प्रतिपादन करायला ही सभा बोलावली आहे असे दिसते. ओक यांनी झेरॉक्स कागदावरील फोटोतून जे चित्र दिसते त्या फोटोची निगेटिव्ह काढून दाखवली.

आणि अंनिसने हा नाडी पट्टीचा फोटो स्वतंत्रपणे मिळवला आहे हा दावा खोटा असे आहे. असे सिध्द केले. जे झेरॉक्स ओकांनी डॉ दाभोलकर व डॉ जयंत नारळीकर यांच्या माहितीसाठी पोस्टाने पाठवले होते तेच हे आहे असे सांगून खळबळ उडवून दिली. ओकांनी पाठवलेले झेरॉक्स 'आम्ही स्वतंत्रपणे मिळवले आहेत' कथन किती खोटारडेपणाचे आहे हे सिध्द केले.  भल्याभल्या तमिळभाषिकांना त्या पट्टीत काय लिहिलेले आहे हे वाचता येत नाही तर पुण्यातील तमिळांनी जर आम्हाला ते काय आहे ते वाचता येत नाही म्हटले तर ती त्यांची सचोटी म्हटली जाईल. म्हणून ताडपट्टीत काहीच लिहिलेले नसते असे सिध्द होत नाही. पेपरात गाजावाजा करून सभेत डॉ दाभोलकर यांची अनुपस्थिती का? असे प्रश्न विचारून अंनिसच्या सभेत ठरलेल्या कार्यक्रमाचा विचका झालेला पाहून काही अंनिस प्रेमी तावातावाने मोठ्या आवाजात एकाच वेळी बोलताना पाहून कार्यकर्त्यांना ओकांनी आवाज चढवून सर्वांना चुप केले. आमच्या सभेत येऊन आम्हाच दम भरताना पाहून अंनिसच्या लोकांत अस्वस्थता होती. प्रकाश पेंडसे यांनी उपस्थिती नोंदली. तो वर डॉ वि ह सरांनी तिथे आलेल्या तमिळ समजणाऱ्या 3 जणांकडून झेरॉक्स मधील नाव वाचायला लावले. आहे तमिळ पण आम्हाला ते वाचायला येत नाही असे ते तोंडी म्हणाले. वि ह सरांनी तिथल्या तिथे त्यांचे निवेदन लेखी नोंदवून नाव, पत्ता, फोन क्र व सही घेऊन वर आम्ही ओक यांना ओळखत नाही आणि अंनिसचे सभासदपण नाही. फक्त पेपरमधे वाचून काय प्रकार आहे ते पहायला आलो आहे. असे लेखी दिले. त्या दिवसानंतर  प्रकाश पेंडसे व ओकाची खूप मैत्री झाली. डॉ वि ह सर तसे रिझर्व प्रवृत्तीचे. पण नंतरच्या भेटीत  खाजगी जीवनातल्या अनेक भीषण गोष्टी सांगून मन मोकळे करत.

---------------------------------------------------------------------------------------

२१ ऑगस्टला चंद्रकांत दादा शेवाळे यांचा जन्मदिन ज्योतिष अधिवेशन म्हणून साजरा केला जातो. तिथे ते दरवर्षी हटकून भेटत. डाऊझिंग वर कुठली नवी पुस्तके लिहिली आहेत, काही लेख कॉन्फरन्समध्ये सादर कुठे केले होते यावर सविस्तर माहिती सांगत.



**श्री चंद्रकांत दादा शेवाळे नाडी ग्रंथ अधिवेशनात सत्कार स्वीकारताना**

अशा एका भेटीत मी म्हटले की सर आपले मॅप डाऊझिंग राहिले आहे. केंव्हा करूया? काही ना काही कारणाने ते पुढे पुढे ढकलत राहिले. मला गड आणि किल्ले संवर्धनाची गोडी वाढली. शिवाजी महाराजांच्या काळातील विविध लढ्यांच्या मांडणीतून इतिहास सादर करण्यात रस वाढला. मिपाच्या मंचावरून त्या लढाया सादर करायला सुरुवात केली. मधल्या काळात नाडीग्रंथ भविष्यावर सतत लेखन केल्याने वैचारिक दुरावा असलेल्यांनी ट्रोलिंग करून नामोहरम करायचे प्रयत्न सोडले.

एका रविवारी मी वि ह सरांना फोन करून विचारले की शनिवार वाडा ही वास्तू भुताटकीसाठी भारतात सर्वात जास्त प्रसिद्ध आहे असे वाटावे इतके यू ट्यूब वर दाखवले जाते आहे. पण पुण्यात तसे वातावरण वाटत नाही. नारायणरावाचा गारद्यांनी खून केला होता. मोठ्या आगी लागून इमारतींचे बांधकाम नष्ट झाले इतपत खरे आहे.

डाऊझिंग करून यावर आपण प्रकाश टाकू शकाल का? या माझ्या विचारणेला त्यांनी ‘कधी येताय बोला. मी तयार आहे’ म्हणून साथ दिली. रिक्षा करून आम्ही शनिवार वाड्यात डाऊझिंग करून भुताटकीचा शोध घ्यायला पोहोचलो.

[शनिवार वाडा शापित वास्तू आहे?]

लिंक क्लिक करून उघडा




तिथे जमलेल्या तरूणांना या शोधात सहभागी व्हायला आवाहन केले. काही तत्परतेने आले. त्यांनी शूटींग करायला पुढाकार घेतला. कळीचा मुद्दा की नारायण रावांचा मृत्यू कसा, कुठे झाला? त्याला मारायला किती लोक आले होते? ती नेमकी जागा कुठली? वगैरे प्रश्नांची उत्तरे डाऊझिंग करून मिळवली गेली. तो व्हिडिओ तयार करण्यात आला. भुते आहेत का? याचे उत्तर या वास्तूत अनेक घटनांतून वारलेले काही अतृप्त आत्मे आहेत हे खरे आहे. असे नंतरच्या चर्चेत ठरले.

नंतरच्या काळात त्यांनी त्यांच्या घरी भेटायला बोलावून सिंहगडावरील घटनांचे, जागांचे शोध नकाशा वरून डाऊझिंग करून निष्कर्ष काढले. ते म्हणाले तसे त्याचे लेखी रुपांतर करून दोघांनी स्वाक्षरी करायला काही ना काही कारणाने राहून गेले ते गेले. त्यांचे स्नेही यांनी त्यांच्या वर व्हिडिओ चित्रीकरण केले. त्यातून सरांच्या कार्याचा परिचय व गौरव केला आहे.

पुष्पौषधीवर आधारित उपचार पद्धतीने ते डाऊझिंग करून ग्राहकांना औषधे सुचवत. आणि लोक बरे होऊन जात.

घरगुती समस्याग्रस्त असूनही ते एकटेच राहात. नातू त्यांची काळजी घेत असे. शेवटपर्यंत ते २ मजले चढून जात येत असत. एरव्ही प्रकृतीच्या तक्रारी नसत. पण एकदा ते म्हणाले होते ते आठवले की शहारा येतो...

अहो ओक, ते सांगायचे राहिलेच...

शनिवार वाडा शापित वास्तू आहे का ते माहित करायला जाऊन आलो आपण त्या रात्री एक वेगळाच प्रकार झाला...

माझ्या गळ्यावर प्रेशर येऊन अस्वस्थता इतकी आली घरच्यांनी लगेच केईएम रुग्णालयात दाखल करून उपचार सुरू केले. पण मला तो त्रास बंद झाला जेंव्हा मी पुष्पौषधीचे उपचार डाऊझिंग करून मिळवले...

पण हे तुम्ही मला त्या वेळेस सांगितले नाहीत! गाजावाजा करायचा माझा स्वभाव नाही... तुमच्यावर प्रभाव झाला होता असे म्हणायचे का? ‘तसेच म्हणावे लागेल’ हसत ते म्हणाले...

